रेवस, ता.अलिबाग, जि.रायगड येथे रो-रो जेट्टी तत्सम सुविधा निर्माण करणे या कामाकरीता रू.२५.०७ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमआयएस १०१८/प्र.क्र.१७१/बंदरे-२**

गृह विभाग, मंत्रालय

मुंबई ४०० ०३२

दिनांक :-२३ जानेवारी, २०१९

वाचा :- मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र क्र. ममेबो/मुकाअ/अभि-३/रेवस रो रो जेट्टी/२०१८-१९/६०९९, दिनांक ०३.१०.२०१८

**प्रस्तावना:**

नवी मुंबई ते अलिबाग ही शहरे जलवाहतूकीमार्गे जोडण्याच्या दृष्टीकोनातून करंजा (ता.उरण) ते रेवस (ता.अलिबाग) अशी रो-रो सेवा विकसीत करण्याचे प्रस्तावित आहे. रेवस ते करंजा हे अंतर रोडमार्गे ८६ कि.मी.असून जलमार्गे ते ३ कि.मी.आहे. रेवस ते करंजा अशी रो-रो सेवा सुरू झाल्यास रेवस येथून करंजा येथे जाण्यासाठी प्रवाश्यांना त्यांची वाहने बोटीने नेता येईल. त्यामुळे वेळेची व इंधनाची बचत होणार आहे. तसेच सदरचा प्रकल्प हा पर्यावरण पुरक होणार आहे. त्यानुषंगाने “रेवस, ता.अलिबाग, जि.रायगड येथे रो-रो जेट्टी व तत्सम सुविधा निर्माण करणे” या कामाच्या रू.२५,०७,१०,८९९/-(पंचवीस कोटी सात लक्ष दहा हजार आठशे नव्व्याणव) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला असून, सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

रेवस, ता.अलिबाग, जि.रायगड येथे रो-रो जेट्टी तत्सम सुविधा निर्माण करण्यासाठीच्या कामांना, केंद्र शासनाकडून मान्यता प्राप्त करण्याच्या अटीच्या अधीन राहून, सागरमाला कार्यक्रमांतर्गत खालील तक्त्यात दर्शविलेल्या रकमेच्या मर्यादेत प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | कामाचे नाव | किंमत |
|---|---|---|
| 1 | Approach Jetty | 15,90,08,000/- |
| 2 | Piled Platform | 1,89,72,472/- |
| 3 | Dredging | 2,41,39,390/- |
| 4 | Quality Control Tests | 3,78,950/- |
| 5 | Electrical cost | 34,71,943/- |
| | **TOTAL** | **20,59,70,755/-** |
| | Add 4% consultancy charges | 82,38,830.20 |
| | Add 4% Conengencies | 85,68,383.41 |
| | Add 0.5% Labour Insurance | 10,71,047.93 |
| | Add 12% GST | 2,68,61,881.98 |
| | **TOTAL** | **25,07,10,899** |

२. सदर प्रशासकिय मान्यता ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. वरिल कामांचे रू.२५,०७,१०,८९९ इतक्या रकमेचे अंदाजपत्रक राज्य सागरमाला समितीच्या मान्यतेने केंद्र शासनास, केंद्र हिश्श्याचा ५०% निधी मिळण्याकरीता सादर करावे.

२. सदर कामांना पर्यावरण तसेच इतर अनुषंगीक विभागांच्या आवश्यक परवानग्या घेण्यात याव्या.

३. वरिल कामावरिल खर्च “मागणी क्र. बी-७, ३०५१ - बंदरे व दिपगृह ०२, लहान बंदरे, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (००) (०३) जेट्टीच्या बांधकामाकरिता केंद्राचे सहाय्य (सागरमाला) (राज्य हिस्सा ५०%) (३०५१ १८९१), ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान” या लेखाशिर्षाखाली मंजुर तरतुदीतून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय केंद्र शासनाच्या सागरमाला कार्यक्रमास मान्यता देणेबाबतच्या मा.मंत्रिमंडळाच्या दि.१९.०९.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार आणि नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२४१/का.१४६१, दिनांक १८.१२.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४३४/२०१८/व्यय-८, दिनांक २८.१२.२०१८ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२४१३१२२४५७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Hanmanlu Damayyawar

Digitally signed by Ashok Hanmanlu Damayyawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bd0dc6138e4f3c9997616b47f0dc918cd4715f466afd0623c843397ffc06a09, serialNumber=2cc45c1c1345a8b6ff1e9fdbd2d12c6527f6d070c05b708bcc57b79b7ef3a95d, cn=Ashok Hanmanlu Damayyawar
Date: 2019.01.24 13:22:58 +05'30'

**(अ. ह. दमय्यावार )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव (बंदरे), मंत्रालय, मुंबई,
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
७. नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवडनस्ती (बंदरे-२)